**पनवेल महानगरपालिका हद्दीमधील समावेशीत गावांच्या क्षेत्राचे नगर भूमापन करण्यास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.६१/ल-१.**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२१.

संदर्भ :-

सम क्रमांक दिनांक ०१.०१.२०२१ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-**

पनवेल महानगरपालिका स्थापन झाल्यापासून महानगरपालिका क्षेत्रात समाविष्ट झालेल्या गावांचे नगर भूमापन न झाल्याने नकाशे तयार झालेले नाहीत. नगर भूमापन झालेले नसल्याने गावठाण क्षेत्रातील भुखंडांची हद्द व क्षेत्रफळ निश्चित झालेले नाही, त्यामुळे पनवेल महानगरपालिका हद्दीतील महसूली गावांमध्ये गावठाण क्षेत्राची मोजणी करणे आवश्यक असल्याने पनवेल महानगरपालिका हद्दीतील २४ या महसुली गावांमध्ये गावठाण क्षेत्राची मोजणी करणे व नगर भूमापन क्रमांक देवून भूखंडाचा नकाशा व मालकी हक्क दस्ताऐवज तयार करण्यास संदर्भीय शासन निर्णयान्वये सदर काम सहा महिन्यात पूर्ण करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. परंतु, कोरोना संक्रमण कालावधीमध्ये शासनाने अधिकारी/कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत वेळोवेळी निर्बंध लागू केले असल्याने मोजणी विहित वेळेत पूर्ण करता आलेली नाही. त्यामुळे पनवेल महानगरपालिका हद्दीतील महसूली गावांमध्ये गावठाण क्षेत्राची मोजणी करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

कोरोना संक्रमण कालावधीमध्ये शासनाने अधिकारी/कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करण्याच्या दृष्टीने मोजणी विहित वेळेत पूर्ण करता आलेली नाही. त्यामुळे पनवेल महानगरपालिका हद्दीतील महसूली गावांमध्ये गावठाण क्षेत्राची मोजणी करणेस दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर नगर भूमापन व सर्वेक्षणाचे काम करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व शर्ती यांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०९३०१५५८५४८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d7496299 70f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A 2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2021.09.30 18:09:29 +05'30'

**( संजय बनकर )**
उप सचिव

**प्रति,**

१. मा.मंत्री/राज्यमंत्री(महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. उपसंचालक, भूमि अभिलेख, कोंकण प्रदेश, मुंबई .
४. आयुक्त, पनवेल महानगरपालिका, पनवेल .
५. अधीक्षक, भूमि अभिलेख, रायगड.
६. निवड नस्ती (ल-१), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.